**मुंबई उच्च न्यायालयामध्ये स्थापित केलेल्या बालसंगोपन केंद्र / पाळणाघर येथे नियुक्त करावयाच्या १ आया व १ केअर टेकर यांचे वेतन अदा करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**विधि व न्याय विभाग**

**शासन निर्णय क्र:- संकीर्ण-५११७/सं.क्र. १५०७/१६/प्र.क्र.३५/का.४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १५ मार्च, २०२४.

**संदर्भ :-** १) प्रबंधक (मूळ शाखा), उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र. C.S./DayCare/१३६, दि.१५/०१/२०२४.
२) शासन निर्णय, विधि व न्याय, समक्रमांक, दि. १८/०४/२०१८.

**प्रस्तावना :-**

फोर्ट, मुंबई येथील सीटीओ इमारतीतील तळमजल्यावरील सुमारे १००० चौ. फू. जागेत मुंबई उच्च न्यायालयातील महिला न्यायिक अधिकारी तसेच इतर महिला अधिकारी व कर्मचारी, उच्च न्यायालयातील विविध बार असोसिएशनच्या महिला वकिलांच्या लहान मुलांसाठी बालसंगोपन केंद्र / पाळणाघर स्थापन करण्यास संदर्भाधीन शासन निर्णय, दि.१८/०४/२०१८ अन्वये शासन मंजूरी प्रदान करण्यात आली आहे. प्रस्तावित बालसंगोपन केंद्रातील कर्मचाऱ्यांच्या प्रतिमाह वेतनावरील आवर्ती खर्च हा सदर सुविधेच्या लाभार्थींना आकारण्यात येणाऱ्या उपभोग दरातून भागविण्यात यावा, या अटीच्या अधीन राहून सदर मान्यता प्रदान करण्यात आली आहे. तथापि, बालसंगोपन केंद्रास उचित प्रतिसाद प्राप्त होईपर्यंत केअर टेकर व आया यांच्या वेतनावरील आवर्ती खर्च भागविण्यास शासनाकडून तरतूद करण्याबाबतचा उच्च न्यायालयाचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

फोर्ट, मुंबई येथील सीटीओ इमारतीतील तळमजल्यावर स्थापित बालसंगोपन केंद्राकरिता नियुक्त करावयाच्या ०१ केअर टेकर व ०१ आया यांच्या सेवा बाहययंत्रणेव्दारे घेण्यास व त्यांच्या एकत्रित वेतनापोटी दरमहा रु. २५,०००/- याप्रमाणे ११ महिन्यांसाठी येणाऱ्या अंदाजित आवर्ती खर्चास या आदेशान्वये प्रशासकीय मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२. उपरोक्तनुसार बालसंगोपन केंद्राकरिता ०१ केअर टेकर व ०१ आया यांना देण्यात येणारे वेतन हे कमीतकमी राहिल याची दक्षता घेण्यात यावी. याकरीता शासनाच्या विहीत पध्दतीचा अवलंब करण्यात यावा.

३. ११ महिन्यांच्या कालावधीनंतर बालसंगोपन केंद्रास मिळणाऱ्या प्रतिसादाचा आढावा घेवून त्याची उपयुक्तता उच्च न्यायालय प्रशासनाने निश्चित करावी. तसेच आवश्यकता

असल्यास उर्वरीत पदे भरण्याबाबतचा प्रस्ताव वित्त विभागाच्या मान्यतेसाठी सादर करण्यात यावा.

४. दरम्यानच्या कालावधीत बालसंगोपण केंद्रामध्ये प्रवेश घेणा-या लाभार्थ्यांची संख्या वाढून, त्या उचित प्रतिसाद लाभल्यास, त्यातून कर्मचाऱ्यांच्या वेतनावरील खर्च भागविता येईल.

५. याप्रित्यर्थ होणारा खर्च हा "मागणी क्र. जे-१, २०१४ न्यायदान (भारित), - १०२ उच्च न्यायालये (०२) (०१) प्रबंधक, मूळ शाखा, (२००१४ ००७४) १० कंत्राटी सेवा " या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो संबंधित वित्तिय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. प्रस्तुत आदेश हे वित्त विभागाचे अनौ. संदर्भ क्र.१०६/व्यय-५, दि. ४/०३/२०२४ अन्वये प्राप्त झालेल्या त्या विभागाच्या सहमतीने तथा सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१६१२५०२२४४१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

VILAS VASANT GAIKWAD

Digitally signed by VILAS VASANT GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=64f5ab9e019c90ad5db684984df113ed09062245cb9e042be5b12e5aa482fc17, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CD7BB8BAA2D72280DD453A12422482D4768A126C83ECB44E84A8186EED4352A0, cn=VILAS VASANT GAIKWAD
Date: 2024.03.16 12:59:28 +05'30'

**(विलास व. गायकवाड)**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव,**
**महाराष्ट्र शासन**

**प्रति,**
महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई
प्रबंधक (मूळ शाखा), उच्च न्यायालय, मुंबई
महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखाअनुज्ञेयता) महाराष्ट्र-एक, मुंबई
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
वित्त विभाग (कार्यासन व्यय-५), मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती.